**शैक्षणिक वर्ष २०१६-१७ पासून राज्यातील प्रथम वर्ष अभियांत्रिकी / औषधनिर्माणशास्त्र/ वैद्यकीय पदवी अभ्यासक्रमांची प्रवेश प्रक्रीया राज्य पातळीवर MHT-CET या सामायिक प्रवेश परीक्षेच्या आधारे करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र.टीईएम-२०१४/प्र.क्र. २७३ /तांशि-४**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२
दिनांक: २८ ऑगस्ट, २०१५.

**संदर्भ :-** १) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. संकीर्ण-२०११/प्र.क्र.३३७/तांशि-४, दिनांक ३१.१०.२०१२.
२) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. संकीर्ण-२०११/प्र.क्र.३३७/तांशि-४, दिनांक ०४.०३.२०१४.

**प्रस्तावना :**

शैक्षणिक वर्ष २०१४-१५ पासून राज्यातील प्रथम वर्ष अभियांत्रिकी पदवी अभ्यासक्रमाचे प्रवेश राष्ट्रीय पातळीवर घेण्यात येणाऱ्या संयुक्त प्रवेश परीक्षेच्या (Joint Entrance Exam-JEE) आधारे करण्यासउपरोक्त संदर्भ क्र १ अन्वये महाराष्ट्र विनाअनुदानित खाजगी व्यावसायिक शैक्षणिक संस्था (प्रवेश व शुल्क यांचे विनियमन) अधिनियम, २०१५ न्वये सदरचे प्रवेअ श शैक्षणिक वर्ष २०१६-१७ पासून राज्य पातळीवरील सामायिक प्रवेश परीक्षेच्या आधारे करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र विनाअनुदानित खाजगी व्यावसायिक शैक्षणिक संस्थां (प्रवेश व शुल्क यांचे विनियमन) अधिनियम, २०१५ मधील तरतुदीनुसार शैक्षणिक वर्ष २०१६-१७ पासून राज्यातील अभियांत्रिकी/औषधनिर्माणशास्त्र/वैद्यकीय पदवी अभ्यासक्रमांचे प्रवेश हे इयत्ता बारावीच्या अभ्यासक्रमांवर आधारित राज्य पातळीवरील सामायिक प्रवेश परीक्षेद्वारे करण्यास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१) राज्यातील विविध अभियांत्रिकी/औषधनिर्माणशास्त्र/वैद्यकीय पदवी अभ्यासक्रमांसाठी प्रथम वर्षाकरीता प्रवेश घेणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी एमएचटी-सीईटी (MHT-CET) ही एकच सामायिक प्रवेश परीक्षा शैक्षणिक वर्ष २०१६-१७ पासून घेण्यात येईल.

२) सदर पदवी अभ्यासक्रमांच्या प्रवेश परीक्षेकरीता विद्यार्थी एकच प्रवेश परीक्षा अर्ज सादर करतील.

३) अभियांत्रिकी/औषधनिर्माणशास्त्र/वैद्यकीय पदवी अभ्यासक्रमांच्या प्रवेश परीक्षेसाठी भौतिकशास्त्र व रसायनशास्त्र (प्रत्येकी ५० गुण) या दोन्हीची प्रश्नपत्रिका सामाईक असेल.
तथापि, गणित (१०० गुण) व जीवशास्त्र (१०० गुण) या विषयांच्या स्वतंत्र प्रश्नपत्रिका असतील.

४) राज्यस्तरीय प्रवेश परीक्षा (एमएचटी-सीईटी) ही राज्य परीक्षा मंडळाच्या इयत्ता बारावीच्या अभ्यासक्रमाच्या धर्तीवर असेल.

५) अभियांत्रिकी, औषधनिर्माणशास्त्र व वैद्यकीय पदवी अभ्यासक्रमांसाठी प्रवेश पात्रता व गुणवत्ता खालीलप्रमाणे राहील :-

अ) राज्यस्तरीय सामायिक प्रवेश परीक्षेत (एमएचटी-सीईटी) प्राप्त केलेल्या गुणांच्या आधारे गुणवत्तेनुसार विद्यार्थ्यांना प्रवेश देण्यात येतील.

ब) सामायिक प्रवेश परीक्षेतील (एमएचटी-सीईटी) गुणांच्या आधारे अभियांत्रिकी, औषधनिर्माणशास्त्र व वैद्यकीय अभ्यासक्रमांसाठी स्वतंत्र गुणवत्ता याद्या तयार करण्यात येतील.

१. अभियांत्रिकी अभ्यासक्रमांसाठीची गुणवत्ता यादी सामायिक प्रवेश परीक्षेतील भौतिकशास्त्र, रसायनशास्त्र व गणित या तीन विषयांच्या गुणांवर तयार करण्यात येईल.

२. औषधनिर्माणशास्त्र अभ्यासक्रमासाठीची गुणवत्ता यादी सामायिक प्रवेश परीक्षेतील भौतिकशास्त्र, रसायनशास्त्र आणि गणित/जीवशास्त्र या तीन विषयांच्या गुणांवर तयार करण्यात येईल.

३. वैद्यकीय अभ्यासक्रमांसाठीची गुणवत्ता यादी सामायिक प्रवेश परीक्षेतील भौतिकशास्त्र, रसायनशास्त्र व जीवशास्त्र या तीन विषयांच्या गुणांवर तयार करण्यात येईल.

क) अभियांत्रिकी पदवी अभ्यासक्रमाच्या प्रवेश पात्रतेसाठी खुल्या प्रवर्गातील विद्यार्थ्याने राज्य परीक्षा मंडळ किंवा समकक्ष मंडळाच्या इयत्ता बारावीच्या परीक्षेत भौतिकशास्त्र, गणित हे अनिवार्य आणि रसायनशास्त्र/जीवशास्त्र/ जैवतंत्रज्ञान/ टेक्निकल व्होकेशनल यापैकी एक विषयात मिळून एकुण किमान ५० टक्के (मागासवर्ग व शारिरीक विकलांग विद्यार्थ्यांनी किमान ४५ टक्के ) गुण प्राप्त करणे अनिवार्य आहे. तसेच औषधनिर्माणशास्त्र व वैद्यकीय अभ्यासक्रमांसाठी संबंधित समूचित प्राधिकरणांनी (मेडीकल काऊन्सिल ऑफ इंडिया, नर्सिंग काऊन्सिल इ. सारख्या) विहीत केलेल्या पात्रतेच्या निकषांची पूर्तता करणे आवश्यक असेल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८२९१०३६३४९५०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dr. Kiran N Patil

Digitally signed by Dr. Kiran N Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dr. Kiran N Patil
Date: 2015.08.29 11:05:35 +05'30'

**( डॉ.किरण पाटील )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) अपर मुख्य सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुबई
४) प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुबई
५) प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुबई
६) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुबई
७) संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, महाराष्ट्र राज्य, मुंबई
९) संचालक, आयुष, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१०) सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालये (सर्व)
११) आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
१२) आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
१३) संचालक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
१४) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, राज्य मंडळ, पुणे
१५) कुलगुरु, सर्व विद्यापीठे

१६) प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त कार्यालय, १ ला मजला, नवीन प्रशासन भवन, मादाम कामा रोड, मुंबई-३२ (पत्राने).
१७) मा. मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, १३ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मादाम कामा रोड, मुंबई-३२ (पत्राने).
१८) मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहायक
१९) मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहायक
२०) मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
२१) मा. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
२२) उच्च व तंत्र शिक्षण विभागातील सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी
२३) महासंचालक, माहिती व जनसंपर्क, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई (प्रसिद्धीसाठी)
२४) निवड नस्ती/तांशि-4